राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद दलाच्या (NDRF) तुकड्यांना आपत्ती प्रतिसादासाठी नियोजित स्थळी पोहोचविण्यासाठी झालेल्या वाहन खर्च मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२१/प्र.क्र.३०८/आव्यप्र-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई: ४०० ०३२.
दि. ३० मार्च, २०२२

**वाचा:-** १) जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, पुणे यांचे पत्र क्र. आव्यप्र/७९/२०२२, दि. १८ फेब्रुवारी, २०२२.

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद दलाच्या तुकड्या संभाव्य पूरग्रस्त जिल्ह्यांना पावसाळ्यापुर्वी तैनात करण्यात येतात. तसेच पूरग्रस्त ठिकाणी बचाव कार्यासाठीही जिल्ह्याच्या मागणीनुसार राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद दल, पुणे तुकड्यांचे पाचारण करण्यासाठी कळविण्यात येते. त्यानूसार राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद दलांना आवश्यक वाहनांची मागणी जिल्हाधिकारी, पुणे यांच्याकडून करण्यात येते. यावर्षी राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद दलाच्या तुकड्यांना नियोजित जिल्ह्यात पाठविण्यासाठी पुणे येथून वाहनांची व्यवस्था करण्यात आली. त्यासाठी झालेला वाहन खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

दि. २१ जुलै, २०२१ ते दि. २७ जुलै, २०२१ या कालावधीत रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग, सातारा, सांगली व कोल्हापूर या जिल्ह्यांत झालेल्या अतिवृष्टीमुळे बचाव कार्य करण्यासाठी राज्यातील राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद दलाच्या तुकड्यांना नियोजित स्थळी पोहोचण्यासाठी करण्यात आलेल्या तसेच अनुषंगीक बाबींवर जिल्हाधिकारी, पुणे यांचेमार्फत झालेल्या खाली नमूद रु. १,०६,३२,६७६/- (रु. एक कोटी सहा लक्ष बत्तीस हजार सहाशे शहात्तर) इतक्या खर्चास मंजूरी देण्यात येत आहे.

२.	यासाठी झालेल्या अनुषंगीक बाबींचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | तपशिल | एजन्सीचे नाव/ कार्यालयाचे नाव | रक्कम |
|---|---|---|---|
| १ | वाहन | ब्ल्यु मेरिडियन हॉलिडेज प्रा.लि. | ८५,०९,०४४/- |
| २ | वाहन | महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, पुणे | २०,५१,६३४/- |
| ३ | विश्रामगृह | सहाय्यक अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र. १ पुणे. | ५,५०८/- |
| ४ | राहण्याची व्यवस्था | तहसिलदार, मुळशी | ५०,४७०/- |
| ५ | भोजन, नाष्टा व इतर | तहसिलदार, हवेली | १६,०२०/- |
| एकूण | | | १,०६,३२,६७६/- |

३.	यासाठी झालेल्या खर्चापोटी सादर केलेल्या देयकाची रक्कम रु. १,०६,३२,६७६/- (रु. एक कोटी सहा लक्ष बत्तीस हजार सहाशे शहात्तर) सदर खर्च हा आपत्ती प्रतिसाद निधीतून अनुज्ञेय असल्याने या खर्चास राज्य कार्यकारी समितीच्या दि. २९ मार्च, २०२२ रोजी झालेल्या बैठकीत तत्वत: मान्यता दिली आहे.

६.	या कामी होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ८० सर्वसाधारण (०१)(०१) महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाचे कार्यालय स्थापन करणे व फर्निचर व साधनसामुग्रीसह सुसज्जीकरण करणे (२२४५ १७६१) ३१ – सहायक अनुदाने या या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७.	अर्थसंकल्पिय वितरण प्रणाली (BDS) सदर निधी विभागीय आयुक्त, पुणे यांना वितरीत करण्यात येत असून तो जिल्हाधिकारी, पुणे यांना वितरीत करण्यात यावा.

८.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०३३०२०२३०४४९१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(हितेंद्र दुफारे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत –

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.

२) वित्तीय सल्लागार व उप सचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
३) जिल्हाधिकारी, पुणे.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), १/२, मुंबई.
५) महालेखापाल (लेखापरिक्षा), १/२, मुंबई.
६) संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८) प्रधान सचिव (आ.व्य., म. व पु.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९) निवड नस्ती, आव्यप्र-१.